**नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पमुवा -२०२३/प्र.क्र.१००/अ-१**
(E-Office no-६७२४१०)
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० एप्रिल, २०२४

वाचा : १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक पमुवा-२०२३/प्र.क्र.१००/अ-१, दि.०५.१०.२०२३
२) वित्त विभाग, शा.नि.क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.०२.२०२४
३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र.भूसंपादन/ कार्या-४(२)/कावि-८२/२०२४, दि.१५.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

वित्त विभाग, शासन निर्णय दि.२१.०२.२०२४ अन्वये, दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधी करीता अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत प्रशासकीय विभागांना अधिकार प्रदान करणेबाबत मान्यता देण्यात आली आहे.

विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्यांचे दि.१५.०२.२०२४ च्या पत्रान्वये, त्यांच्या अधिनस्त असलेल्या भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत विनंती केली आहे. यापूर्वी उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये, दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ प्रदान करण्यात आलेली आहे. त्याच धर्तीवर भूसंपादन कार्यालयामध्ये कार्यरत पदांचा आकृतीबंध निश्चित झालेला नसल्यामुळे वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करून विभागीय आयुक्त, नागपूर यांचे अधिनस्त विभागातील भूसंपादन कार्यालयातील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये नागपूर विभागातील भूसंपादन अस्थापनेवरील एकूण ९४ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२३ ते दि.२९.०२.२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली होती. सोबत जोडलेल्या जोडपत्र (अ) मध्ये दर्शविलेली सदर एकूण ९४ अस्थायी पदे दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ पर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे-

१) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदावरील अधिकारी / कर्मचारी यांना विभागामार्फत रिक्त पदावर सामावून घेण्यात आले आहे अथवा वित्त विभागाकडील अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करण्यात आले आहे.

२) अतिरिक्त ठरविण्यात आलेल्या पदांवरील कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यांचे प्रदान कोणत्याही परिस्थितीत विभागातील कायम / स्थायी, अस्थायी पदांसाठीच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून करण्यात येत नाही.

३) प्रस्तावाधीन प्रकरणामध्ये मुदतवाढ प्रस्तावित करण्यात आलेल्या पदांपैकी कोणतेही पद ६ महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नाही अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू ठेवलेले नाही.

४) सदर अस्थायी पदांच्या वेतनाचा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

५) सदर पदांचा अस्थायी पदांच्या आढाव्यामध्ये समावेश आहे.

**२.** ही सर्व पदे संबंधित विभागाच्या स्थायी संवर्गातील तात्पुरती भर म्हणून समजण्यात यावी.

**३.** सदरहू पदांवरील पदधारक शासनाच्या वेळोवेळी निघालेल्या आदेशांप्रमाणे महागाई भत्ता व इतर पूरक भत्ते मिळण्यास पात्र राहतील.

**४.** याबाबत होणारा खर्च मागणी क्र. सी-१/२०२९/जमीन महसूल-००१-संचालन व प्रशासन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०२) भूमी संपादन आस्थापना योजनांतर्गत (०२), (०५) आयुक्त, नागपूर वेतने (२०२९ ०२४२ ०१) आणि योजनेतर पदावरील खर्च, योजनेतर (०१)(०५) आयुक्त, नागपूर वेतने (योजनेतर) (२०२९ ०१२६ ०१) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून तो खर्च वित्तीय वर्ष २०२२-२०२३ व २०२३-२०२४ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच याबाबतचा प्रत्यक्ष खर्च वर्षअखेर संबंधित संपादन विभागाकडे (महसूल व वन विभागाखेरीज) वर्ग करण्यात यावा.

**५.** सदर पदांच्या आवश्यकतेबाबत दि.३१.०८.२०२४ पूर्वी आढावा पूर्ण करण्याच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय वित्त विभाग,शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२१.२.२०२४ अन्वये प्रशासकीय विभागांना दिलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

विभागीय आयुक्त, नागपूर यांनी त्यांच्या आस्थापनेवरील व नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील मंजूर पदांचा आढावा घ्यावा. पदांचा आढावा घेताना शासनाच्या कार्यपद्धतीतील तंत्रज्ञानाचा वाढता वापर, काळानुरुप शासनाच्या मनुष्यबळात बदल व मनुष्यबळाच्या परिणामकारक वापराची आवश्यकता या बाबींचा विचार करुन अनावश्यक पदे कमी करण्याचाही विचार करावा. दि.०१.०३.२०२४ ते दि.३१.०८.२०२४ या कालावधीमध्ये आढाव्यास (नव्याने निर्माण केलेल्या पदांसह) उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतिबंध निश्चित करणे आवश्यक आहे. सबब,

त्याबाबतचे प्रस्ताव विहित कालावधीत शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी. अन्यथा, मुदतवाढीअभावी सदर अस्थायी पदांना वेतनाचा प्रश्न उद्भवल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी आपल्या कार्यालयाची राहील याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२४०४१०१७४५५८०९१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2024.04.10 17:57:50 +05'30'

**( माणिक ढमाले )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत :** जोडपत्र-अ

**प्रति,**

१. प्रधान सचिव (वने), महसूल वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर (२ प्रती)
३. महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर (२ प्रती)
४. जिल्हाधिकारी, नागपूर/वर्धा/चंद्रपूर/ भंडारा/गोंदिया/ गडचिरोली.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / वर्धा /चंद्रपूर / भंडारा / गोंदिया / गडचिरोली.
६. जलसंपदा विभाग, कार्यासन (टि-४/टि-१२/टि-१९, मोप्र-२, अर्थ-१ व बी शाखा), मंत्रालय, मुंबई-३२.
७. उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. उपसचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. उपसचिव (अर्थ-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०. कार्यासन अधिकारी (अ-२/अ-३/अ-४/ई-१/ई-६/ई-७/ई-८/भ-१,र-१२) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवडनस्ती ( अ-१ ), मंत्रालय, मुंबई-३२.

## जोडपत्र - अ

**महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक पमुवा-२०२३/प्र.क्र.१००/अ-१, दि.१०/०४/२०२४**

नागपूर विभागातील भूसंपादन आस्थापनेवरील मुदत वाढ द्यावयाच्या ९४ अस्थायी पदांबाबतचे विवरणपत्र:-

| अ.क्र. | जिल्हा | मुदतवाढीसाठी नागपूर विभागातील अस्थायी पदांचा तपशील | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | उपजिल्हाधिकारी | अव्वल कारकून | मंडल अधिकारी | कनिष्ठ लिपिक | वाहन चालक | शिपाई | एकूण |
| ०१ | नागपूर | ०७ | ०६ | ०५ | ०७ | ०० | १२ | ३७ |
| ०२ | वर्धा | ०४ | ०३ | ०३ | ०३ | ०१ | ०८ | २२ |
| ०३ | भंडारा | ०४ | ०४ | ०४ | ०४ | ०० | ०८ | २४ |
| ०४ | चंद्रपूर | ०१ | ०० | ०० | ०० | ०० | ०० | ०१ |
| ०५ | गोंदिया | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०० | ०२ | ०६ |
| | एकूण-अ | १७ | १४ | १३ | १५ | ०१ | ३० | ९० |
| ०६ | विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर<br>नगर रचनाकार- ०१<br>अव्वल कारकून -०२<br>लघुटंकलेखक - ०१<br>एकूण -ब = ०४ | | | | | | | ०४ |
| | एकूण (अ+ब) | | | | | | | ९४ |

******

MANIK VITTHAL DHAMALE

Digitally signed by MANIK VITTHAL DHAMALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=56ec16312a634dd1d6237d2d17aa0f5fb47d9a2353765a9688e57f460b5271d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D2C09929ACAFC324A4E5E44875953A3AEF77C004844BEE29381808FC25AAC97F, cn=MANIK VITTHAL DHAMALE
Date: 2024.04.10 17:58:35 +05'30'

( माणिक ढमाले )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.